**दिनांक १ जानेवारी ते दिनांक १५ जानेवारी,२०१७ या कालावधीत मराठी भाषा संवर्धन पंधरवडा साजरा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः- मभापं-२०१६/प्र.क्र.११८/भाषा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०३ डिसेंबर, २०१६

वाचा:- मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्रमांक-मभापं-२०१५/प्र.क्र.७०/भाषा-२, दिनांक २२ जुलै,२०१५.

## शासन परिपत्रक

मराठी भाषेचे वैभव जपण्यासाठी व भाषेच्या संवर्धनासाठी राज्यभर दिनांक १ जानेवारी ते १५ जानेवारी हा कालावधी प्रतिवर्षी "मराठी भाषा संवर्धन पंधरवडा" म्हणून साजरा करण्याचा निर्णय संदर्भाधीन दिनांक २२ जुलै,२०१५ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. त्याअनुषंगाने राज्यातील सर्व शासकीय/निमशासकीय कार्यालये/महामंडळे, राज्यातील केंद्र शासनाच्या अखत्यारीतील सर्व कार्यालये/मंडळे/सार्वजनिक उपक्रम, सर्व खाजगी व व्यापारी बँका, सर्व शैक्षणिक संस्था/विद्यापीठे/महाविद्यालये इत्यादी सर्व संस्थांनी दिनांक १ जानेवारी,२०१७ ते १५ जानेवारी, २०१७ या कालावधीत "मराठी भाषा संवर्धन पंधरवडा" साजरा करण्याबाबत पुढील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

(१) राज्यामध्ये मराठी भाषेचा राजभाषा म्हणून सार्वत्रिक वापर करण्याच्या दृष्टीने सदर पंधरवड्यात सर्व संस्था / कार्यालये यांनी विविध नाविन्यपूर्ण उपक्रमांचे आयोजन करावे. यामध्ये सर्व मंत्रालयीन विभाग व विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय कार्यालये/ महामंडळे / स्थानिक संस्था, राज्यातील केंद्र शासनाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये / महामंडळे / उपक्रम, सर्व खाजगी व व्यापारी बँका यांनी सक्रीय सहभाग घ्यावा.

(२) सर्व मंत्रालयीन विभागांनी आपले कार्यालय व विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय कार्यालयांना **"मराठी भाषा संवर्धन पंधरवडा"** साजरा करण्याबाबत सविस्तर आदेश द्यावेत.

(३) सर्व शाळा व महाविद्यालये यांनी त्यांच्या स्तरावर सदर पंधरवड्यात भाषा संवर्धनाकरिता विविध परिसंवाद / व्याख्याने / स्पर्धा / कार्यशाळा / शिबिर यांचे औचित्यपूर्ण आयोजन करावे.

(४) मराठी वाचन संस्कृती वाढावी यादृष्टीने संबंधित तज्ज्ञ व्यक्तींकडून मार्गदर्शन तसेच ग्रंथ प्रदर्शन, कथाकथन, काव्य वाचन इत्यादीचे आयोजन करावे.

(५) राज्यातील अमराठी भाषिकांना मराठी भाषेचा सुलभ पध्दतीने परिचय करुन देण्याच्या दृष्टीने कार्यशाळा / स्पर्धा इत्यादीचे आयोजन करावे.

(६) त्रिभाषा सूत्रानुसार राज्यातील केंद्र शासनाच्या अखत्यारितील सर्व कार्यालये / मंडळे / सार्वजनिक उपक्रम यांनी मराठीचा वापर करणे अनिवार्य आहे. तरी याबाबतची जागरुकता निर्माण करण्याकरिता सदर कार्यालयांनी या पंधरवड्यात विविध नाविन्यपूर्ण उपक्रमांचे आयोजन करावे.

(७) सर्व खाजगी बँका / व्यापारी बँका यांनी आपापल्या कार्यालयांतर्गत मराठी भाषेसंबंधी वैविध्यपूर्ण कार्यक्रमाचे आयोजन करावे.

(८) मराठी भाषेच्या वापराबाबत जागरुकता निर्माण करण्याकरिता संबंधित कार्यालयंनी आपल्या संकेतस्थळाच्या माध्यमातून याबाबतचे संदेश प्रसारित करावेत.

या कार्यक्रमासाठी येणारा खर्च प्रत्येक वित्तीय वर्षात त्या त्या संबंधित विभागाने / कार्यालयाने त्यांच्या कार्यालयीन खर्चातून मंजूर होणाऱ्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१६१२०३१६५११८८४३३ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Leena Vivek Dhuru

Digitally signed by Leena Vivek Dhuru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Leena Vivek Dhuru
Date: 2016.12.03 16:53:03 +05'30'

**( लिना वि. धुरु )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) मा.मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
५) कुलगुरु, सर्व विद्यापीठे,
६) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई (पत्राने),
७) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (पत्राने),
८) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई

९) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानसभा, विधानभवन, मुंबई,
१०) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवाआयोग, मुंबई (पत्राने),
१२) सर्व विभागीय आयुक्त,
१३) सर्व जिल्हाधिकारी,
१४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१५) शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक / उच्च माध्यमिक / प्रौढ शिक्षण व अल्पसंख्यांक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१६) शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१७) मा.मंत्री (मराठी भाषा) यांचे विशेष कार्य अधिकारी,
१८) महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
१९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२१) भाषा संचालक, भाषा संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई,
२२) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२३) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
२४) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
२५) सर्व विभागीय सहायक भाषा संचालक, पुणे / नागपूर / औरंगाबाद / नवी मुंबई,
२६) सर्व मंत्रालयीन विभाग (त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयांना सविस्तर सूचना देण्याबाबत)
२७) निवड नस्ती (भाषा-२).